आंतरराष्ट्रीय कृषी विकास निधी सहाय्यित "नव तेजस्विनी-महाराष्ट्र ग्रामीण महिला उद्यम विकास प्रकल्प" राबविण्यास मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-माविम-२०१६/प्र.क्र.६७/का-१०**

नविन प्रशासन भवन, तिसरा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख-०८ जोनवारी, २०१९.

**वाचा :-**

१. महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.माविम-२००२/प्र.क्र.१०६/का-१०, दि.०५ फेब्रुवारी, २००७.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्रातील स्वयंसहाय्यता बचत गटांची मालकी लोकांकडे हस्तांतरीत करणे, स्थायी विकासासाठी लोकांची संस्था उभारणे, त्यांना विकसित व बळकट करणे, महिलांची क्षमता, कौशल्य विकसित करणे, उपजीविकेच्या साधनांवर त्यांची मालकी प्रस्थापित करणे, महिलांचा राजसत्तेत, निर्णय प्रक्रियेत कृतीशिल सहभाग वाढविणे, व्यवस्थापन माहिती पध्दती विकसित करणे, गटांना बँकेशी जोडून देणे यासाठी आंतरराष्ट्रीय कृषी विकास निधी (आयफॅड) सहाय्यित तेजस्विनी महाराष्ट्र ग्रामीण महिला सक्षमीकरण कार्यक्रमाची अंमलबजावणी माविमने वर्ष २००७ ते २०१८ या कालावधीमध्ये केलेली असून सदर कार्यक्रम माहे मार्च २०१८ मध्ये संपुष्टात आला आहे. मार्च, २०१८ पर्यंत माविमने विविध विकासात्मक कार्यक्रमांतर्गत १.०८ लाख महिला स्वयंसहाय्य बचत गटांची स्थापना केलेली असून त्यामध्ये १३.०५ लाख महिलांचा सहभाग आहे. या बचत गटांची एकूण बचत ₹४८९.६१ कोटी झालेली असून विविध बँकांमार्फत ₹२०३१.७५ कोटींचे कर्ज गटांना मिळालेले आहे. बँकेमार्फत बचत गटांवर सुरु असणाऱ्या कर्जाची रक्कम ₹३५१.०० कोटी असून त्याच्या परतफेडीचा दर ९९% इतका आहे.

२. तेजस्विनी कार्यक्रमाच्या यशस्वीततेच्या आधारे महिला सक्षमीकरणाचा अजेंडा पुढील टप्प्यावर घेवून जाण्याची गरज दिसून येत आहे. स्वयंसहाय्य बचत गटातील सदस्यांना उपजीविकेच्या माध्यमांची संधी मिळणे, त्यांच्या सुरू असलेल्या व्यवसायामध्ये मूल्य वृध्दी होणे व त्याव्दारे त्यांना उत्पन्न वृध्दीचा लाभ मिळणे, स्थानिक बाजारपेठे व्यतिरिक्त विस्तारीत स्वरुपाच्या विपणन जाळ्यामध्ये (Marketing Network) सहभागी होण्यासाठी वखार पालनासारख्या (Warehousing) सहाय्यकारी प्रणालीशी महिलांना जोडले जाणे (access) या दृष्टीकोनातून लोकसंचलित साधन केंद्राला (CMRC) सहाय्य करणे अत्यंत गरजेचे आहे. थोडक्यात उपरोक्त प्रमाणे नमूद केलेले वेगवेगळ्या प्रकारचे साध्य अधिक वृध्दींगत करणे व दारिद्र्य निर्मूलन आणि महिला सक्षमीकरणाशी निगडीत उपक्रमांची अंमलबजावणी अधिक विस्तारीत स्वरुपात करणे याकरिता “नव तेजस्विनी-महाराष्ट्र ग्रामीण महिला उद्यम विकास प्रकल्प” राबविण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय :-**

तेजस्विनी कार्यक्रमाच्या यशस्वीततेच्या आधारे महिला सक्षमीकरणाचा अजेंडा पुढील टप्प्यावर घेवून जाण्याकरिता आंतरराष्ट्रीय कृषी विकास निधी सहाय्यित "नव तेजस्विनी-महाराष्ट्र ग्रामीण महिला उद्यम विकास प्रकल्प" (Nav Tejaswini - Maharashtra Rural Women's Enterprise Development Project) राबविण्यासाठी खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

१. सदर कार्यक्रम राबविण्याबाबत केंद्र सरकार, महाराष्ट्र शासन व आंतरराष्ट्रीय कृषी विकास निधी (IFAD) यांच्यामध्ये करार करण्यास या शासन निर्णयाव्दारे मान्यता देण्यात येत आहे.
२. नव तेजस्विनी-महाराष्ट्र ग्रामीण महिला उद्यम विकास प्रकल्प" (Nav Tejaswini- Maharashtra Rural Women's Enterprise Development Project) सन २०१८-१९ ते सन २०२३-२४ या सहा वर्षाच्या कालावधीमध्ये महिला व बाल विकास विभागाच्या वतीने महिला आर्थिक विकास महामंडळामार्फत (माविम) राबविण्यास मान्यता देण्यात येत आहे.
३. आंतरराष्ट्रीय कृषी विकास निधी (IFAD) सहाय्यित "नव तेजस्विनी- महाराष्ट्र ग्रामीण महिला उद्यम विकास प्रकल्प" राबविण्यासाठी आयफॅडकडून $५१.६० मिलियन (₹३३५.४० कोटी) इतका निधी कर्जरुपाने उपलब्ध करुन देण्यास व सदर कार्यक्रम राबविण्यासाठी प्रशासकीय खर्चासाठी $२९.८६ मिलियन (₹१९३.१५ कोटी) इतका निधी राज्य शासनाचा हिस्सा असा एकूण $८१.४६ मिलियन (₹५२८.५५ कोटी) निधी उपलब्ध करुन देण्यास मान्यता देण्यात येत आहे.
४. सदर कार्यक्रमाची अंमलबजावणी "तेजस्विनी महाराष्ट्र ग्रामीण महिला सक्षमीकरण" कार्यक्रमांतर्गत नियमित/ कंत्राटी पध्दतीने भरती करण्यात आलेल्या तथापि अद्याप कार्यरत असलेल्या महिला आर्थिक विकास महामंडळाच्या मंजूर कर्मचाऱ्यांमधूनच करण्यास मान्यता देण्यात येत आहे.
५. आंतरराष्ट्रीय कृषी विकास निधी (IFAD) सोबत करावयाच्या कराराच्या आवश्यक त्या अनुषंगिक बाबींची पूर्तता करण्यासाठी शासन स्तरावर विहीत मार्गाने शासन मान्यता घेण्यात येईल.
६. सदर योजनेवरील खर्चाची तपशीलवार परिगणना आंतरराष्ट्रीय कृषी विकास निधी (IFAD) च्या तांत्रिक सहाय्याने करण्यात येणार आहे. सदर योजनेच्या प्रस्तावित ₹५२८.५५ कोटी अंदाजित खर्चाच्या मर्यादेतच अंतिम परिगणनेस नियोजन व वित्त विभागांची विहीत मार्गाने मान्यता घेण्यात येईल.
७. सदर कार्यक्रमाच्या संनियंत्रण व मूल्यमापनासाठी खालीलप्रमाणे तीन समित्या गठित करण्यात येत आहेत.

अ) राज्यस्तरीय शक्तीप्रदान समिती (Empowered Committee) :-

| | | |
|---|---|---|
| मा.मुख्य सचिव | - | अध्यक्ष |
| अप्पर मुख्य सचिव - नियोजन विभाग | - | सदस्य |
| प्रधान सचिव/ सचिव - वित्त विभाग | - | सदस्य |
| प्रधान सचिव / सचिव - ग्राम विकास विभाग | - | सदस्य |
| प्रधान सचिव/ सचिव - महसूल विभाग | - | सदस्य |

प्रधान सचिव/ सचिव - कृषी विभाग - सदस्य
प्रधान सचिव/ सचिव - महिला व बाल विकास विभाग - सदस्य
प्रधान सचिव/ सचिव - आदिवासी विकास विभाग - सदस्य
प्रधान सचिव/ सचिव - सामाजिक न्याय विभाग - सदस्य
उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, माविम - सदस्य सचिव

सदर समिती या कार्यक्रमाच्या प्रगतीचा आढावा वार्षिक तत्वावर घेईल.

ब) राज्यस्तरीय कार्यकारी समिती (State Level Executive Committee) :-

प्रधान सचिव/ सचिव, महिला व बाल विकास विभाग - अध्यक्ष
प्रधान सचिव / सचिव, ग्राम विकास विभाग - सदस्य
प्रधान सचिव/ सचिव, कृषी विभाग - सदस्य
उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक,माविम - सदस्य सचिव

सदर समितीची कार्ये खालीलप्रमाणे :-

१. सदर समितीची दर सहा महिन्यातून एकदा बैठक घेण्यात यावी.
२. कार्यक्रमांचे सातत्यपूर्वक संनियंत्रण केले जाईल तसेच कार्यक्रमाच्या प्रगतीचा समितीमार्फत वेळोवेळी आढावा घेतला जाईल.
३. समितीव्दारे AWPB (Annual Work Plan and Budget) ला अंतिम मंजूरी देण्यात येईल.
४. कार्यक्रमांतर्गत प्रत्येक वार्षिक नियोजन व अंदाजपत्रक AWPB (Annual Work Plan and Budget) हा लोकसंचलित साधन केंद्र (CMRC) व्दारा माविम जिल्हा समन्वय अधिकारी यांच्या मार्गदर्शनाखाली तयार होऊन माविम मुख्यालयास प्राप्त होईल. त्यास माविम संचालक मंडळाची मान्यता घेण्यात येईल व त्यांनतर IFAD ची मान्यता घेवून कार्यकारी समितीची अंतिम मान्यता घेण्यात येईल.
५. कार्यक्रमाचा आढावा दर ०४ महिन्यांनी होणाऱ्या माविमच्या मा.संचालक मंडळाच्या बैठकीमध्ये AWPB च्या लक्ष्य/साध्य नुसार घेण्यात येईल.

क) जिल्हास्तरीय सल्लागार समिती (District Level Advisory Committee) :-

मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद - अध्यक्ष
प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा - सदस्य
जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी - सदस्य
कृषी, पाणी पुरवठा, आरोग्य, शिक्षण यांसारख्या जिल्हा स्तरावरील विविध विकासात्मक विभागांचे जिल्हा प्रतिनिधी - सदस्य
नाबार्ड जिल्हा प्रतिनिधी - सदस्य
अग्रणी बँक अधिकारी - सदस्य
स्वयंसेवी संस्था नेटवर्क प्रतिनिधी - सदस्य
माविमचे जिल्हा समन्वय अधिकारी - सदस्य सचिव

जिल्हास्तरीय सल्लागार समितीमार्फत कार्यक्रमाचे संनियंत्रण व वेळोवेळी आढावा घेण्याचे काम केले जाईल.

८. सदर कार्यक्रमाचे नियमानुसार वेळोवेळी लेखा परीक्षण केले जाईल.

९. आयफॅडकडून घेण्यात येणारे दीर्घ मुदतीचे कर्ज हे १.२५% व्याज दर (Interest Rate) व ०.७५% सेवाशुल्क (Service Charges) ने राज्य शासनास प्राप्त होणार असून कर्जाच्या परतफेडीसाठी ०५ वर्षे अधिस्थगन कालावधी (Moratorium Period) राहणार आहे. परिणामी कर्ज परतफेड ही कार्यक्रम पूर्ण झाल्यानंतर ०५ वर्षांनी सुरु होणार असून त्यानंतर ती २० वर्षापर्यंत करण्यात येईल.

१०. सदर कार्यक्रमाच्या कर्ज करार व कार्यक्रम करारातील अटी व शर्तीनुसार कार्यक्रम राबविण्याची जबाबदारी महिला आर्थिक विकास महामंडळाची राहील.

११. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.११६/१४७२, दि.१८.०७.२०१८ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.८७/२०१८/अर्थबळ, दि.२७.०८.२०१८ ला अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

१२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१९०१०८१५४१३६६३३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Smita Dattatray Nivatkar

Digitally signed by Smita Dattatray Nivatkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women and Child Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3fa46cf1e928518ffc98619187a1ef6de2dd57c16934e9cb6672cc02aa258b08, serialNumber=f9bd2a7c214922f8f4939e80711ece461c9dfd9c679b28f98e79475c5ea90e21, cn=Smita Dattatray Nivatkar
Date: 2019.01.08 15:51:09 +05'30'

**( स्मिता निवतकर )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष/ सदस्य, विधानसभा/ विधानपरिषद, विधानमंडळ, मुंबई
३. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मुंबई
४. मा.मंत्री, नियोजन/ वित्त विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा.मंत्री/ राज्यमंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
७. सर्व विभागांचे अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालय, मुंबई
८. सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
९. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०.उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ, बांद्रा, मुंबई
११.सर्व विभागीय उप आयुक्त, महिला व बाल विकास (माविममार्फत)
१२.सर्व जिल्हाधिकारी (माविममार्फत)
१३.सर्व कार्यासने, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१४.निवड नस्ती, का-१०.